कोठेवाडी, ता. पाथर्डी, जि. अहमदनगर येथील घटनेसंबंधी उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल क्रिमीनल अपिल क्र.५५७, ५९०, ५९१/२००५ आणि ३१०, १६४/२००६ मध्ये शासनातर्फे विशेष समुपदेशी म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. विजयकुमार डी. सपकाळ यांना व्यावसायिक फी मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एसपीपी २०१०/१२३७/प्र.क्र.२६५/पोल-१०**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक : २३ फेब्रुवारी ,२०११.**

**संदर्भ :-** विधी व न्याय विभागाचे क्र.१०४/क्रि.जन/१०/'अ' शाखा, दि. ९.९.२०१०चे पत्र.

**शासन निर्णय :-** कोठेवाडी दरोडा / सामुहिक बलात्कार प्रकरणी (पाथर्डी पो. स्टे. गु.नों.क्र.८/२००१) अतिरिक्त सत्र न्यायालय, अहमदनगर यांनी ठोठावलेल्या शिक्षेच्या विरोधात आरोपींनी उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल केलेल्या क्रिमीनल अपिल क्र.५५७/०५, ५९०/०५, ५९१/०५ आणि ३१०/२००६, १६४/२००६ मध्ये शासनाच्या वतीने काम पाहण्यासाठी ॲड. श्री. विजयकुमार डी. सपकाळ यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक ९.९.२०१० च्या पत्रान्वये विशेष समुपदेशी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. विजयकुमार डी. सपकाळ यांनी १३ दिवस सुनावणीचे कामकाज पाहिले असल्याचे प्रमाणित करण्याच्या अटीवर त्यांना एकत्रित रु.१,५०,०००/- प्रमाणे फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करून घेण्यात यावे, व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. यावाबतचा खर्च मागणी क्र.मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर- १३२/११/व्यय-७, दिनांक ११.२.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२२११६०६३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि. वि. दपके)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.

विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.

ॲड.श्री. विजयकुमार डी. सपकाळ, न्यायदान, ६४ लक्ष्मी नगर, सूतगिरणी जवळ, गारखेडा एरिया, औरंगाबाद.

निवड नस्ती (पोल-१०).